GR-200407281 24845001-1100

**<u>आजारी लघु उद्योगांच्या पुनरुज्जीवनासाठी ज्या सोयी सवलती देण्यात येतात त्यामध्ये अविकसित भागातील आजारी लघु उद्योगांना वाढीव सवलत देणे.</u>**

महाराष्ट्र शासन
उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,
शासन निर्णय, क्रमांक:एसयुसी-२००१/(२८११)/उद्योग-१०,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक- २१ एप्रिल २००१

वाचा:- १) शासन निर्णय, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक:एसयुसी-१०८८/(८११)/उद्योग-१०, दिनांक २६ मार्च १९९२.
२) शासन निर्णय, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक:एसयुसी-१०९६/(६०४)/उद्योग-१०. दिनांक १४ मे १९९६.

**<u>प्रस्तावना:-</u>** राज्य शासनातर्फे आजारी लघु उद्योग घटकांना देण्यात येणा-या सोयी सवलती अगोदरच जाहीर केल्यास त्याची दखल वित्तीय संस्था/बँका पुनरुज्जीवन योजना बनवितांना घेऊ शकतील म्हणून कार्यप्रणालीत बदल करण्यात यावा. म्हणून दिनांक १४ मे १९९६ च्या शासन निर्णयाद्वारे सुधारणा करण्यात आली होती. त्याची प्रमुख वैशिष्टये खालीलप्रमाणे होती:-

अ) संबंधीत आजारी लघु उद्योगाला वित्तीय सहाय्य करणा-या वित्तीय संस्था/बँक यांनी बनविलेल्या पुनरुज्जीवन योजनेत राज्य शासनातर्फे खालीलप्रमाणे सोयी सवलती देण्यात येतील. शुश्रुषा कार्यक्रम अंमलात येण्याच्या दिनांकादिवशी राज्य शासनाची सर्व देणी म्हणजेच विक्रीकर, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळाच्या थकबाकीची मूळ रक्कम, व्याज व दंडनिय व्याज इत्यादींसह जी एकूण रक्कम होईल ती सर्व रक्कम थकबाकी म्हणून समजण्यात यावी . आजारी घटकाने ही संपूर्ण थकबाकी जास्तीत जास्त ३६ मासिक हप्त्यामध्ये व त्यावर १३% वार्षिक व्याजाने परतफेड करणे आवश्यक आहे.

ब) आजारी औद्योगिक घटकाला वित्तीय सहाय्य करणा-या बँक/वित्तीय संस्थांनी संबंधित आजारी उद्योग घटकाकरिता शुश्रूषा कार्यक्रमाअंतर्गत पुनरुज्जीवन योजनेचा प्रस्ताव, त्यामध्ये योजना सुरु होण्याच्या दिनांकासह योजनेचा कालावधी नमूद करुन संबंधित उद्योग केंद्राच्या महाव्यवस्थापक/जिल्हा उद्योग केंद्राच्या अधिक्षकीय उद्योग अधिका-याकडे सादर करावा.

क) उपरोक्त प्रस्ताव महाव्यवस्थापक/जिल्हा उद्योग केंद्राच्या अधीक्षकीय उद्योग अधिका-याकडे प्राप्त झाल्यानंतर त्यांनी (शक्य तो एक आठवड्याच्या आत) सदर औद्योगिक घटकास "आजारी उद्योग प्रमाणपत्र" योजना सुरु होणा-या दिनांकासह योजनेचा कालावधी नमूद करुन द्यावे.

[कृ.मा.प.]

आजारी उद्योग प्रमाणपत्र मिळविणाऱ्या लघु उद्योगास उपरोक्त (अ) मध्ये नमूद केलेल्या सोयी सवलती आपोआप प्राप्त होतील.

**शासन निर्णय:-** वित्तीय संस्थानी/बँकानी कमी केलेले व्याज दर लक्षात घेता अविकसित भागातील ( क, ड, व ड+, विना उद्योग जिल्हे) आजारी लघु उद्योगांना या शासन निर्णयाद्वारे वाढीव सवलत देण्यात येत असून प्रस्तावनेतील शुश्रूषा कार्यक्रम अंमलात येण्याच्या दिनांकापर्यंतची राज्य शासनाची सर्व देणी म्हणजेच विक्रीकर, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळाच्या थकबाकीची मूळ रक्कम या थकबाकीच्या वसुलीसंदर्भात ३६ हप्त्यावरुन ६० मासिक हप्त्यापर्यंत वाढ करण्यात येत आहे. तसेच थकबाकीवरील व्याज जे १३% आहे ते कमी करुन आता थकबाकीचा व्याज दर १०% राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

शेखर ढवळे,
कार्यासन अधिकारी.

उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक:- ७ जून, २००१

## शुध्दीपत्रक

**उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-एसयुसी-२००१/(२९५१)/उद्योग-१०**

शासन निर्णय, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-एसयूसी-२००१/(२८९१)/उद्योग-१०, दिनांक २१ एप्रिल २००१ मधील पृष्ठ क्रमांक २ वर प्रसिध्द झालेला शासन निर्णयाचा मजकूर पुढीलप्रमाणे आहे.

"वित्तीय संस्थांनी बँकानी कमी केलेले व्याज दर लक्षात घेता अविकसित भागातील (क, ड, व ड + विनाउद्योग जिल्हे) आजारी लघु उद्योगांना या शासन निर्णयाला वाढीव सवलत देण्यांत येत असून, प्रस्तावनेतील शुश्रूषा कार्यक्रम अंमलात येण्याच्या दिनांकापर्यन्तची राज्य शासनाची सर्व देणी म्हणजेच विक्रीकर, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळाच्या थकबाकीची मूळ रक्कम या थकबाकीच्या वसूलीसंदर्भात ३६ हप्त्यावरून ६० मासिक हप्त्यापर्यन्त वाढ करण्यांत येत आहे तसेच थकबाकीवरील व्याज जे १३% आहे ते कमी करुन आता थकबाकीचा व्याजाचा दर १०% राहील".

उपरोक्त मजकूरामध्ये साधारण बदल करण्यात आला असून सुधारित मजकूर आता खालीलप्रमाणे वाचावा.

१) " राज्यातील सर्व भागातील आजारी लघु उद्योगाच्या पुनर्वसनासाठी महाराष्ट्र राज्य विज मंडळाची थकबाकीची तसेच सर्व शासकीय थकबाकीची वसुली १३% व्याज आकारुन ३६ मासिक हप्त्यामध्ये सध्या करण्यांत येते. सदर १३ टक्के व्याजाचा दर कमी करण्यात येऊन तो दर आता १०% असा करण्यांत आला आहे."

२) सामुहिक प्रोत्साहन योजनेखाली जाहिर केलेल्या औद्योगिक विभागातील फक्त क, ड, ड+ आणि विना-उद्योग जिल्हे या भागातील आजारी लघु औद्योगिक घटकांच्या थकबाकीच्या वसुलीच्या हप्त्यांची सध्याची ३६ हप्त्यांची संख्या वाढवून ती आता ६० हप्त्यापर्यंत वाढविण्यात येत आहे.

हा शासन निर्णय दिनांक १०.०१.२००१ च्या मंत्रीमंडळ बैठकीत मान्य झालेल्या महाराष्ट्राचे औद्योगिक धोरण २००१ च्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( शेखर वपळे )

कार्यासन अधिकारी